# VETHBIGARI AANI ISLAM

# वेठबिगारी

# आणि

# इस्लाम

लेखक : सुल्तान अहमद इस्लाही

भाषांतर : सय्यद मुजाहिद अली

# विषय सूची

*''अल्लाह, असीम, दयावंत व कृपावंत च्या नावाने''*

# वेठबिगारी हिन्दुस्थानात

स्वातंत्र्य व समानतेसाठी पुढारलेल्या आजच्या हिन्दुस्थानात ज्या समस्यांना त्याच्या माथ्याचा कलंक संबोधले जाऊ शकते त्या पैकी एक समस्या म्हणजे (BONDED LABOUR) वेठबिगारीची आहे. त्याद्वारे कीती तरी स्वतंत्र्य लोकांचे अधिकारांना व हक्कांना काही स्वार्थी लोकांच्या वेदी वर भेट चढविले जात आहे. एक निराधार मनुष्य त्याचे संपूर्ण भांडवल म्हणजे मेहनत मजूरीची कार्यक्षमता काही सावकारांच्या हातात गिरवी ठेवतो व त्याची आयुष्यभरासाठी पिळवणूक केली जाते. अशाप्रकारे मनुष्य दासत्वाचे जीवन व्यतीत करण्यासाठी मजबूर होतो.

भारतीय घटनेच्या मुलभूत हक्कां (अधिकारा) (Fundamental Rights) च्या कलमात पिळवणुकी पासून सुरक्षित ठेवण्याचा अधिकार (Right Against exploitation) च्या विषयाखाली जबरदस्तीची मजूरी (Forced Labour) चा निषेध केला आहे. (Indian Constitution P. 24) आणि याला पाच वर्षा पूर्वीच भारतीय पार्लमेंटने (Bonded Labour Abolition Act) च्या कायद्यात रूपांतर करून सुध्दा ही कुप्रथा आज भारतात कृतीत उपलब्ध आहे. हे एक असे सत्य आहे की देशाच्या वर्तमान पत्रातून विचारवंत व बुध्दीजीवी लोकांचे याविषयीचे रिपोर्ट (बातमी) नेहमी प्रकाशित होत आहेत. या विषयी इंडियन एक्सप्रेस दैनिकात काही पुरावे (proof) दाखविले आहेत. हे दैनिक धन्यावादास पात्र आहे की त्यामुळे अत्याचारित लोकांना न्याय मिळाला.

याच वर्तमानपत्राची बातमी आहे की कोठे दूर नाही तर न्यू दिल्लीच्या मध्यभागात दुसऱ्या शब्दात सांगायचे तर केंद्र सरकारच्या समोर हरिजनांचा ज्यांच्यापैकी बहुतेक राजस्थानातून पळून आलेले होते, त्यांना वेठबिगार म्हणून उपयोग केला जात आहे. त्यांच्याकडून दगडाच्या खानीतून खूप कमी प्रमाणात मजूरी देऊन काम घेतले जाते. आणि त्यांना वाईट परिस्थिती जगण्यास मजबुर केले जाते. ह्याचा अंदाज आपण ह्या तपसीलाने लावू शकतो की, त्यांच्या गुहे सारख्या

झोपड्यापासून एक कि. मी. अंतरावर फक्त एक कच्ची विहिर होती ती ही उन्हाळ्यात सुकून जाते. आरोग्य सेवा तेथे काहीच नाही. कामावर जास्तीत जास्त मजुरांना ईजा होते आणि कित्येकांचे डोळे निकामी होतात. परंतु त्यासाठी मोबदला (Compensation) दिला जात नाही. त्यांना ठेकेदाराकडून त्यांची मजुरीची जागा (Site) सोडण्याची परवानगी सुध्दा नसते. ह्या साठी ठेकेदार भाड्याच्या गुंडांची मदत घेण्यास सुध्दा चूकत नाहीत.

यानंतर वर्तमानपत्र लिहितो की, मजेची गोष्ट ही आहे की ही दुकाने Delhi Small Industries Development Corporation (DSIDC) च्या ताब्यात आहेत. त्याने आपल्या ठेकेदारांना ह्या निराधार मजूरांची पिळवणूक करण्यासाठी खुली सुट दिली आहे. यावरून देशाच्या कानाकोपऱ्यातून आलेले हे वेठबिगार कोणत्या परिस्थितीत आहेत ह्याचा अंदाज आपण लावू शकता (इंडियन एक्सप्रेस, न्यू दिल्ली, संपादकीय Slavery in Disguise)

यापेक्षाही भयानक स्थिती हरियाना आणि पंजाब मध्ये विट भट्टयात काम करणारे वेठविगारांची आहे. त्यांची ह्याच वर्तमानपत्राने १४ ऑगस्ट १९८० च्या संपादकीय मध्ये Rampant Slavery (उरिया गुलामी) च्या विषयी असे लिहिले आहे.

हे सिसरा (Sisra) चे एक कुटूंब आहे. जे सोळा व्यक्तीवर अवलंबून आहे. त्याच्यात स्त्री-पुरुष व मुले सामील आहेत. भूक उपासमारी गरीबी दारिद्रयाने बेजार होऊन तीन वर्षा पूर्वी हे कुटूंब हरियानाच्या जिल्हा सोनपुरच्या सुसना (Susana) येथे आलेले आहे. तिथे एक विट भट्टीवाल्याकडे ते सर्वजण काम करायला लागतात. हा अत्याचारी भट्टी मालक गुडांची मदत घेऊन त्या सर्वांना कैद्या सारखे ठेवत आहे. तो त्यांच्या आणि त्यांच्या मुलांकडून सकाळ ते संध्याकाळपर्यंत काम राबवून घेतो. त्यांच्या स्त्रियांची छेडछाड करण्याला सुध्दा तो चुकत नाही. त्यांना ठरवलेला मोबदला देण्याऐवजी निकृष्ट गव्हाचे पीठ थोड्या थोड्या प्रमाणात त्यांच्या हवाली करत असतो. विट तयार करण्याचा ऋतु संपल्यावर यांना पानीपत जिल्ह्याच्या एका दुसऱ्या विटभट्टीवाल्यांला २५००/- रुपये घेऊन विकतो. हा नवीन भट्टी मालक

जास्तच अत्याचारी आहे. तो स्त्रियांचे संपूर्ण चांदीचे दागिने लुटून घेतो. आणि एखादा मजूर दिलेल्या सक्तीच्या कामाला करु शकला नाही तर त्याला मरे पर्यंत मारतो. अशा प्रकारे शेवटपर्यंत रक्त शोषल्यानंतर तो भट्टी मालक त्यांना समलखा (Samalkha) गावच्या दुसऱ्याला साडेसात हजारात विकून टाकतो. (ही घटना हे पुस्तक लिहिण्याच्या एक आठवडा पूर्वीची आहे.)

सीसराच्या ह्याच मजूरांनी सांगितले की अशाप्रकारे जवळ जवळ दहा हजार कुटूंब राजस्थानहून आलेले आहेत. ते पंजाब आणि हरियानाच्या विटभट्टी मालकाकडे गुलामी (दासता) चे जीवन व्यतित करत आहेत. यानंतर वर्तमानपत्र समीक्षण करून लिहितो की.

"सर्व सामन्यपणे संपूर्ण देशात कितीही वेठबिगार मिळतात. यावर वेगवेगळे अनुमान (अंदाज) आहेत आणि आपण काही लाखा पर्यंत अनुमान करू शकतो. परंतु समजा वेठबिगार आणि अशाप्रकारची गुलामी (दासता) ची संपूर्ण आकृति लक्षात ठेवली तर हे (अंदाजा) अनुमान लावणे सुध्दा वर्तमान स्थिती पेक्षा कमीच असेल."

वेठबिगारीची ही घृणास्वदस्थिती देशाच्या कानाकोपऱ्यात आहे. याच वर्तमान पत्राची बातमी आहे की, तामिलनाडू चे तीरा पत्तूर (Tira Patur) तालूक्यातील एकच गाव कादीराम पत्ती (Kadiram Patti) मध्ये तीनशे हरिजन कुटूंबाना एकशे सत्तरा हिन्दू जमीनदारांनी वेठबिगार करून ठेवले आहे. इतर याच तालुक्याच्या गावात सर्व सामान्य अशीच स्थिती आहे. हरिजन लोक पांढरी धोती आणि बुट घालून गावाच्या रस्त्यावर चालू फिरू शकत नाहीत.

*(इंडियन एक्सप्रेस २ डिसेंबर १९८० संपादकीय Harijans in Bondage)*

अशाच प्रकारे गांधी पीस फॉउंडेशन (Gandhi Peace Foundation) चा रिपोर्ट आहे की भारतातील फक्त दहा राज्यात सव्वीस (२६) लाख वेठबिगार अस्तित्वात आहेत. *(इंडियन एक्सप्रेस १९ मे १९८१)*

परंतु सत्य आहे की भारतामध्ये ही तिरस्करणीय कुस्थिती मोठ्या प्रमाणात अस्तित्वात आहे. जसे अताच यु.पी. डेव्हलपमेंट सिस्टीम कोपेरिशन (U.P.

Development Systems Corporation) ची ताजी बातमी आहे की इलहाबाद आणि बांधा जिल्ह्याचे फक्त दोन ब्लॉक शंकरगड आणि माणिकपूर मध्ये या वेठबिगारांची संख्या बारा हजार एकशे ब्यानव (12,192) आहे. सात सदस्यांवर आधारित सत्यशोधन कमिटीच्या रिपोर्ट मध्ये या मजूरांची हृदयद्रावक स्थिती दाखविली आहे. जंगलात व जनावरांच्या फार्म मध्ये काम करणारे तीन हजार एकशे सोळा (3,116) मजूर जवळ जवळ उपासमारीचे जीवन व्यतित करत आहेत. शंकर गड ब्लॉक मध्ये आठ हजार नौशे शाहात्तर (८,९७६) वेठबिगारांची जास्त संख्या दगड कापणे, लोखंड आणि वाळू च्या खानीत आणि फार्म मध्ये काम करत आहेत. माणिकपूर ब्लॉकमध्ये या वेठबिगारांची एक दिवसाची मजूरी प्रत्येकी एक रुपया बेचाळीस पैसे (१=४२) होती. परंतु शंकरगडामध्ये यांना यापेक्षा काही जास्त मिळत होते. फार्म मध्ये काम करणारे वेठबिगारांना अर्धा किलो निकृष्ट धान्य प्रत्येकी एक दिवसाला मिळते. त्यांना काही भूमि सुध्दा देण्यात आली.

स्वतंत्र्य भारतात वेठबिगारींची कुप्रथा सर्व सामान्य आहे. याचा अनुमान याने लावू शकतो की १४ मे रोजी रोहतक जिल्ह्याच्या ससराम गावांत दगडाच्या खानीमध्ये काम करणारे जवळ जवळ आठ हजार मजूरांना वेठबिगार ठरवून त्यांना स्वतंत्र्य करण्यासाठी त्यांच्या घरांना सुध्दा विकण्यात आलेले आहे. अशाच प्रकारे २४ फेब्रुवारी १९८१ च्या ह्याच वर्तमानपत्राची बातमी मध्ये हरियानाची बहादूरगड औद्योगिक वसहात पासून सहा कि. मी. अंतरावर (Bhrai) भराई नावाच्या एका गावात विटभट्टीवाल्याच्या पंज्यातून सतरा कुटूंबाना सोडविले जे वेठबिगार म्हणून उपयोगात येत होते. त्यांच्यात एक पन्नास वर्षाची वृध्द महिला होती. तिला भट्टीवाल्याने गुलाम म्हणून पकडून ठेवले होते. त्यांच्या पैकी नऊ कुटूंबाचा संबंध मध्य प्रदेशाच्या छत्तीसगड क्षेत्राशी होता. उर्वरित कुटूंब यु. पी. चे जिल्हा बुलंद शहराचे रहिवासी होते. मजेची गोष्ट ही आहे की ही जागा दिल्लीच्या फक्त तीस किलोमीटर अंतरावर होती. वर्तमानपत्राने सुध्दा वेठबिगारांचे फोटो मुखपृष्ठावर प्रकाशित केले आहेत.

# वेठबिगारीची कुप्रथा

वेठबिगारीच्या या कुप्रथेच्या दुष्परिणामांचा एक मनुष्य अनुभव घेऊ शकतो.

एक मनुष्य स्वतंत्र्य आहे परंतु त्याला आपल्या स्वातंत्र्यापासून वंचित केले जाते.

एका स्वतंत्र्य मनुष्याला आपले व्यक्तीस्वातंत्र्य व अधिकारापासून वंचित करून दुसऱ्याजवळ बळजबरीने ठेवले जाते आणि त्याला काम करण्यासाठी मजबूर केले जाते.

एक मनुष्य एक काम करू इच्छित नाही परंतु त्याला आपल्या इच्छे विरुध्द काम करण्यासाठी मजबूर केले जाते.

एक असहाय मनुष्याला ज्याचे एकमेव उपजीविकेचे साधन त्याची मेहनत व मजूरीची कार्यक्षमता आहे. परंतु त्याच्या हातातून त्याच्या एकमेव साधनाला हिसकावून घेतले जाते.

ह्या कुप्रथेचे शिकार सर्वसामान्यपणे असहाय आणि मागासवर्गीय लोक आहेत. त्यांच्या नशिबात वंचितता लिहिलेली असते. समजाचा उच्चवर्ग त्यांना मनमानेल तसे अन्याय व अत्याचाराच्या चक्कीत पिसत आ॰. याविरुध्द त्या अत्याचारित मनुष्याच्या बाजूने कोणीही आवाज उठवत नाही. परिणामी त्यांचे संपूर्ण जीवन दु:खी, हलाखीचे व नुकसानीचे बनले आहे.



# इस्लामी उपाय

आमची श्रध्दा आहे की जीवनाच्या इतर समस्यांप्रमाणे वेठबिगारीची समस्या सोडविण्यासाठी इस्लामी उपाय परिपूर्ण आहे. कारण इस्लामीपध्दतीने समानता व न्याय कायम करणे आणि अत्याचार व अन्यायाला संपविणे हे कार्य दुसऱ्या धर्मासाठी आणि जीवनपध्दतीसाठी अशक्य आहे.

दुसरे संपूर्ण वाद, धर्म आणि जीवन पध्दतीत उपाय तात्पूरत्या स्वरूपाचे आहेत. मनुष्याच्या बारीक समस्या पर्यंत पोहचणे आणि या संपूर्ण पैलूवर नजर ठेवणे अशक्य आहे. नियमित जीवन पध्दतीच्या पात्रतेशी ते वंचित आहेत.

सर्वशक्तीमान व परोक्षाचे ज्ञान बाळगणाऱ्या ईश्वराने दिलेली जीवन पद्धती फक्त परिपूर्ण आहे. त्या जीवन प्रणालीचे नाव 'इस्लाम' आहे.

जगाचे दूसरे संपूर्ण जीवन तत्वज्ञान आणि त्यांची घटनात्मक कागदपत्रके (Documents) फक्त तात्पुरते परिणामकारक आहेत. मनुष्याच्या अंतकरणात ती ताकत अंमलबजावणी करण्यासाठी कुचकामी ठरते. इस्लामी घटना आणि कायदे मनुष्याच्या अंतकरणात ईशभय आणि मरणोत्तर जीवनाचे भय निर्माणकरून अंमलबजावनीला (Implements) तयार होते. ह्यामुळे याला सादर करणाऱ्यांना कायदयाच्या सुरक्षेत खोट आणि कपटाशिवाय समाजात अंमलबजावणी करण्याची संधी मिळते. निष्ठा ठेवणारा समाज कायद्याच्या दंडा व्यतिरिक्त ईशभयाने त्याने सादर केलेल्या घटनेला आपल्या जीवनात आणण्याचा प्रयत्न करतो.

आता आपण हे पाहुया की वेठबिगारीपासून मानवतेची सुटका इस्लामी जीवनशैलीत कशा प्रकारे होते.



# इस्लामचे तत्व ज्याने वेठबिगारी नष्ट होते.

**१) अत्याचारावर प्रतिबंध** - वेठबिगारी अत्याचार व अन्यायाची वाईट अवस्था आहे. याकडे काही लक्ष वेधण्याची आवश्यकता नाही की ह्यात एक चांगला भला मनुष्य असहायतेत संपूर्ण जीवनभर खडतर जीवन व्यतीत करण्यासाठी मजबूर होतो.

इस्लाम अन्याय व अत्याचाराच्या विरोधात आहे. इस्लाम न्यायाचा संरक्षक आहे. त्याने प्रत्येक अन्याय व अत्याचाराला प्रतिबंध घातला आहे.

अशा प्रकारे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी हदीस खुदसीमध्ये फर्मावले की "अल्लाह म्हणतो, "हे माझे दास (बंदे) ! मी माझ्यावर अत्याचाराला हराम (निषिध्द) ठरविले व तुमच्या मध्ये सुध्दा त्याला हराम केले आहे, तर माझ्या दासांनो ! तुम्ही आपसात एक दुसऱ्यावर अत्याचार करु नका."

इस्लामच्या दृष्टीत अत्याचार फक्त याचेच नाव नाही की कोणत्याही मनुष्याची विनाकारण हत्या करणे किंवा कोणत्याही मनुष्यावर डाका टाकून त्याची संपत्ती हिसकावून घेणे. इस्लाम जवळ अत्याचाराचा अर्थ खुप मोठा विस्तारित आहे. तो कोणत्याही मनुष्याला वैध हक्कापासून वंचित ठेवणे व कोणा विषयी संबंध गोष्टींना अटकाव करणे व त्यासाठी प्रयत्नशील असणे अत्याचार आहे. या संबंधी इब्ने खुलदुमचा खालील खुलासा आहे.

"हा विचार करु नका की अत्याचार फक्त कोणाचा माल किंवा संपत्ती त्याच्या मालकाकडून मोबदला दिल्याविना घेणे आहे, जसे की हे प्रसिद्ध आहे. अत्याचाराची व्याप्ती फार मोठी आहे. ज्याने कोणी कोणाची संपत्ती हडप केली व कोणत्याही प्रकारच्या कामामध्ये अडथळा आणला किंवा त्याच्यावर अशा जबाबदारीचे ओझे टाकले की ज्याला शरीयत ने परवानगी दिली नाही, तर तो अत्याचार करतो. विना अधिकाराचे माल गोळा करणारा अत्याचारी आहे. कोणत्याही पद्धतीने मालावर हक्क (अधिकार) जमविणारा अत्याचारी आहे. अशा प्रकारे सर्व साधारणपणे जे संपत्तीवर अन्याय करणारे असतील ते अत्याचारी आहे. आणि ह्या संपूर्ण गोष्टीची जबाबदारी सरकार वर येते. लोकसंख्या सरकारची संपत्ती आहे व ती नष्ट होत जात आहे. अत्याचारामुळे संपूर्ण ध्येय थंड पडत आहे."

एक सर्वसाधारण मनुष्य ज्याला त्याच्या वारसा हक्कात काहीच संपत्ती मिळाली नसेल किंवा मोठ्या पदव्या आणि मोठ्या प्रमाणात बौध्दीक व वैचारिक पात्रतेपासून वंचित आहे. अशा माणसांचे भांडवल त्याच्या कमाईची क्षमता मेहेनत व मजुरीची पात्रता असते. आता कोणी सावकार त्याच्यापासून त्याच्या जीवनाचे भांडवल आणि संपत्ती जोर जबरदस्तीने हिसकाऊन घेतो किंवा त्याला फार कमी दरात विकण्यासाठी मजबूर करतो तर याचा अर्थ तो जीवनाच्या आनंदापासून वंचित राहून फक्त नेहमीसाठी कैदेत राहात आहे. तो अशा स्थितीत रात्रं दिवस मरण्याची वाट पहात आहे. पुढे संस्कृती विनाशाला अत्याचार व अन्याय कसा पात्र ठरतो त्याचे वर्णन करतांना लेखक लिहितो.

"सर्वात जास्त वाईट अत्याचार जो लोकांचा विनाश करत आहे, तो हा आहे की प्रजेपासून जोर जबरदस्तीने काम घेतले जाते. त्यांच्यावर वेगवेगळ्या जबाबदारीचे कार्यक्षमतेचे ओझे टाकले जाते. कार्य सुध्दा संपत्ती (Property) च्या समान आहे. आम्ही पुढे त्याला सविस्तर आपल्या समोर ठेवू. मजूरी आणि मिळकत लोकांच्या कार्यक्षमतेचा सारांश आहे. त्याचप्रमाणे त्यांचे कार्य (मेहनत) कोणत्याही स्वरुपातील असो ती त्यांची संपत्ती (Property) आहे. खरी गोष्ट म्हणजे त्यांच्या जवळ या व्यतिरिक्त कोणाचीही संपत्ती (कार्यक्षमता) नाही. यासाठी कीं सर्व साधारणत: लोक श्रम करत आहे. त्यांची श्रम व मजुरी हीच त्यांची खरी कमाई आहे. जर त्यांच्याशी अयोग्य पद्धतीने काम घेतले जाईल आणि आपल्या मजुरी संबंधी त्यांना फक्त मजबूर व बेबस करून टाकले जाईल तर त्यांची कमाई (मजूरी) नष्ट होईल. शेवटी त्यांच्या श्रमाचे काहीच मुल्य होणार नाही. जेव्हा की हीच वस्तु त्यांचे एकमेव भांडवल (Capital) आहे. तर ते निकामी होईल व त्यांची (श्रम) मजूरीचा मोठा भाग नष्ट होईल. मोठा भाग तर त्यांची एकून मजुरी असते. आणि जुलुम व अत्याचाराची चक्की त्यांना मृत करून शेवटी ते वाईट मार्गावर चालू लागतात. अशा स्थितीत समानतेच्या गाडीला पुढे येण्याऐवजी ती खाली बसून जाते. आणि नतंर हीच गोष्ट मानवतेला नष्ट करण्यासाठी जबाबदार असते.

## २) त्रासाचा अभाव (अदम ज़रर)

इस्लामचे दुसरे तत्व ज्याने वेठबिगारी नष्ट होते ते त्रासाचा अभाव आहे. इस्लामजवळ जीवनाची मौजमजा आणि त्याचा आनंद ही काही मौज करण्यांची संपत्ती (इज़ारादारी) नाही. सर्व मानव एक ईश्वराचे दास आहेत आणि एकाच माता पित्याची (आदम व हवा) संतान आहे. जीवन आनंद लुटणे आणि आपल्या पात्रतेनुसार जीवनात आपला वाटा घेण्याचा प्रत्येक माणसाचा जन्मसिध्द हक्क आहे. दुसऱ्या कोणत्याच मनुष्याला याचा अधिकार पोहचु शकत नाही की त्याला त्याच्या अधिकारापासून वंचित करावे किंवा कोणाच्या आकांक्षांना पायदळी तुडवून आपल्या मनोइच्छेची इमारत उभी करावी. यामुळेच इस्लाम सक्तीने या तत्वाचा स्वीकार करतो की प्रत्येक मनुष्याने आपल्या वैध सीमेत रहावे. आणि आपल्या सीमेत राहूनच आपल्या अधिकारांचा इच्छूक रहावे. कोणीही दुसऱ्याला त्रास आणि नुकसान पोहोचू नये व कोणाला त्रास देण्याचा प्रयत्न करू नये. प्रेषित (स.) यांनी फर्माविले की,

"ना कोणी कोणाला त्रास देण्याचा लक्ष्य (शत्रु) होताना कोणी कोणाला त्रास देण्याचा लक्ष बनविल."

अशाच प्रकारे दुसरे हदीस कथन आहे की,

"जे कोणी दुसऱ्याला त्रास देईल अल्लाह त्याला त्रास देईल. आणि जो कोणी दुसऱ्याशी (विनाकारण) दुश्मनी करेल अल्लाह त्याच्याशी दुश्मनी (लक्ष्य) ठेवील."

पती-पत्नीच्या मध्ये त्यांच्या संबंधात काही घटक कार्य करीत असतात. एक सर्वसाधारण मनुष्य ही इच्छा ठेवतो की, दबून ही खरं पण वैचारिक मतभेद ठेवले पाहिजे. परंतु इस्लाम पती-पत्नीमध्ये घटस्फोट घेऊन एक दुसऱ्या पासुन त्यांना स्वतंत्र्य करतो. परंतु एकदुसऱ्याला त्रास देणे पसंत करीत नाहीत. कुरआनोक्ती आहे,

"आईला आपल्या मुलांमुळे त्रास पोहचु नये ना की बाप आपल्या मुलांमुळे त्रासामध्ये त्रस्त राहिल." (२:२२२)

स्पष्ट आहे की जेव्हा इस्लाम पती पत्नीच्या दरम्यान त्रासाला सहन करू शकत नाही तर दोन विनाओळखी माणसात त्रास सहन करण्यासाठी इस्लाम तयार नाही.

## ३) एखाद्या स्वतंत्र्य मनुष्याला त्याच्या स्वातंत्र्यापासुन वंचित ठेवणे उचित नाही.

वेठबिगारी जसे की आपण पाहिले की एक मनुष्य स्वतंत्र्य होऊन सुध्दा तो दास (गुलामी) चे जीवन व्यतीत करण्यासाठी मजबूर आहे. इस्लामच्या जवळ स्वातंत्र्य प्रत्येक मनुष्याचा जन्मसिध्द हक्क आहे आणि व्यक्तिला उचीत नाही की स्वतंत्र्य मनुष्याला त्याच्या अधिकारापासून वंचित करावे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले की,

"असे तीन मनुष्य आहे ज्यांची अल्लाह नमाज स्वीकारणार नाही. एक तो आहे जो समाजाच्या नेतृत्वासाठी पुढे आला पण त्याला कोणी पसंत करीत नाही. दुसरा जो सामुदायिक नमाज मध्ये नेहमी शेवटीच पोहचतो. तीसरा तो मनुष्य जो आपल्या स्वतंत्र्य व्यक्तीला पुन्हा गुलाम करतो."

स्वतंत्र्य व्यक्तिला गुलाम करण्याचे दोन मार्ग आहेत.

एक हा आहे की, एक मनुष्य आपल्या गुलामाला आजाद करतो आणि त्यानंतर त्याला लपवितो किंवा त्याला पहिल्यापासूनच नकार देतो. दुसरा प्रकार की स्वतंत्र्य केल्यानंतर त्यांच्याकडून जबरदस्तीने काम घेतो. यावरून कोणत्याही स्वतंत्र्य मनुष्याला गुलाम करण्याचा दुसऱ्या मार्गाचा अनुमान करु शकतो. हदीसमध्ये आहे की प्रलयाच्या दिवशी अल्लाह काही लोकांविषयी तक्रार करेल. जो स्वतंत्र्य माणसांना विकून त्याची रक्कम खाऊन टाकतील.

कोणीही स्वतंत्र्य व्यक्तिला विकून त्याची रक्कम खाने ही जुल्म आणि अत्याचाराची वाईट कृती आहे. हीच बाब सर्व कृती पेक्षा वाईट आहे की कोणी स्वतंत्र्य मनुष्याला त्याच्या स्वातंत्र्यापासुन वंचित ठेवतो. यासाठी या सर्वांचा एकत्रित परिणाम एक सारखाच असेल.

जर कोणी कोणत्याही स्वतंत्र्य मनुष्याला विकले तर त्याने ह्या बाबीत खर्च करण्यासाठी स्वत:ला वंचित ठेवले. ज्याला अल्लाहने त्याला उचित (जायज) ठरविले होते आणि त्याला अल्लाहने धिक्कारित केले ज्यापासून अल्लाह ने त्याला सुरक्षित ठेवले होते.

## ४) कोणत्याही स्वतंत्र्य मनुष्याला जोर जबरदस्तीने थोपणे (बलपूर्वक) रोखणे उचित नाही.

वेठबिगारीत एखाद्या व्यक्तीला बळाने रोखून (थोपवून) घेतले जाते. आणि त्याला आपल्या विचारापासून व अधिकारांपासून वंचित केले जाते. परंतु इस्लाम प्रत्येक स्वतंत्र्य मनुष्यासाठी त्याच्या मर्जीनुसार काम करण्यास त्याचा मुलभूत हक्क समजतो. कोणत्याच व्यक्तीसाठी उचित नाही की त्याला त्याच्या अधिकारापासून वंचित करावे. पती आणि पत्नी एक काळापासून एकत्रित रहातात. त्यांचे संबंध वैवाहिक असून त्यांच्या मध्ये नात्यांचे कितीही घटक कार्य करत असतात. परंतु घटस्फोटानंतर इस्लाम पतीसाठी कोणताही अधिकार देत नाही की त्याच्या पूर्वीच्या पत्नीला त्याने थोपवून धरावे. अल्लाह फर्मावितो.

"आणि जेव्हा तुम्ही पत्नींना तलाक द्याल व त्या आपला प्रतिक्षाकाळ पूर्ण करतील तेव्हा सर्वसंमत पद्धतीने त्यांना आपल्या जवळ ठेवून घ्या किंवा सन्मानपूर्वक त्यांना निरोप द्या. आणि त्यांना त्रास देण्यासाठी अडकवून ठेवू नका. जेणेकरून तुम्ही त्यांच्यावर अत्याचार करावा यात अतिरेक करणारा स्वत:वरच अत्याचार करील. अल्लाहच्या संकेत वचनांशी खेळ करू नका." *(२:२३१)*

तलाकनंतर पती आपल्या पूर्वीच्या पत्नीचा दुसरा विवाह कोठेच होऊ नये म्हणून कधी कधी प्रयत्न करतो किंवा तिला अविवाहित ठेवले जाते. परंतु इस्लाम या दोन्ही बाबीला अनुचित ठरवितो. आता पती व पत्नी मध्ये जो करार करण्यात आला होता तो आता तुटला आहे. कुरआनोक्ती आहे की,

"जेव्हा तुम्ही आपल्या पत्नींला तलाक द्याल आणि त्या प्रतिक्षाकाळ पूर्ण करतील तेव्हा त्यांच्या नियोजित वराशी विवाह करण्यापासून प्रतिबंध करू नका जेव्हा ते संमत्तीपूर्वक एकमेकांशी विवाह करू इच्छित असतील. तुम्हाला उपदेश देण्यात येत आहे की असे कृत्य मुळीच करू नका जर तुम्ही अल्लाह आणि अंतिम दिवसावर श्रध्दा ठेवणारे असाल. तुमच्यासाठी पवित्र आणि पावन पद्धत हीच आहे की तुम्ही यापासून परावृत्त रहावे अल्लाह जाणतो पण तुम्ही जाणत नाही."

*(२:२३२)*

इस्लाम पती-पत्नीच्या संबंधात जे के खुप काळापर्यंत एकदुसऱ्यांच्या वैवाहिक बंधानात बांधलेले होते, त्यांच्यापैकी एकाला हक्क नाही की दुसऱ्याला जोरजबरदस्तीने रोखावे. आणि त्याला त्याच्या स्वातंत्र्याच्या अधिकारापासून वंचित करावे.

**५) कोणत्याही स्वतंत्र्य मनुष्याशी त्याच्या मर्जी विरुध्द काम घेणे उचित नाही.**

वेठबिगारीत जसे की आपण पाहिले एका मनुष्याला जोर जबरदस्तीने त्याच्या मर्जी विरुध्द काम करण्यास विवश केले जाते. इस्लाम कोणत्याही स्वतंत्र्य मनुष्याला रोखने त्याच्या मर्जी विरुध्द उचित समजत नाही. ह्याच प्रकारे कोणत्याही मनुष्याला त्याच्या मर्जी विरुध्द काम घेणे उचित समजत नाही. अरबामध्ये प्रथा होती की संपत्ती जमा करण्यासाठी आपल्या दासी (लौंडी) शी जोरजबरदस्तीने व्यवसाय करून घेत होते. इस्लामचा आगमन झाला आणि त्याने या कार्याला (practice) सक्तीने (निषिध्द) प्रतिबंध घातला अल्लाह सांगतात,

"आणि आपल्या दासींना आपल्या ऐहिक लाभापोटी वेश्या व्यवसायासाठी अगतिक करू नका जेव्हा त्या स्वत: सच्चरित्र राहू इच्छित असतील आणि कोणी बळजबरी केली तर या जबरदस्ती नंतर अल्लाह त्याच्यासाठी क्षमा करणारा आणि परम कृपाळू आहे." *(सूरे नूर ३३)*

ही तर जगाच्या व्यवहाराची बाब आहे. इस्लाम कुरआनला मार्गदर्शक स्वीकार करणे किंवा न करण्यासाठी बळजबरी करत नाही. कुरआनचा विरोध करून मनुष्य या जगात अयशस्वी आणि मरणोत्तर जीवनात नामुराद होऊन नरकाच्या खाईत पडतो. परंतु इस्लाम त्याला सुध्दा जबरदस्तीने कोणाच्या डोक्यावर थोपवित नाही. तर तो सर्वसाधारण जीवनात जबरदस्तीची परवानगी का देऊ शकेल? कुरआनमध्ये अल्लाह प्रेषित मुहम्मद (स.) यांना उद्देशून सांगतो की,

"आणि तुझ्या पालकर्त्याची इच्छा असती तर पृथ्वीवर तितके लोक आहे ते सर्व ईमानदार (श्रध्दांवत) असते. तरी तुम्ही लोकांशी काय जबरदस्ती करणार की त्याच्यावर ते ईमान आणेल?" *(सुरे युनुस ९९)*

## मजूरां संबंधी इस्लामची शिकवण

इस्लामचे हे तत्व आहे ज्यामुळे जगातून वेठबिगारी समाप्त होत आहे. आता आपण पाहुया की इस्लाम मजुरासंबंधी कोणता दृष्टिकोण स्वीकारतो आणि समाजातील कमकुवत लोकांचे अन्याय व अत्याचारापासून रक्षण करण्यासाठी काय उपाय करतो.

१) **चांगले वर्तन (व्यवहार)** - या संबंधी सर्वात अगोदर इस्लामने मजूर आणि नोकर यांच्याशी चांगला व्यवहार करण्याची शिकवण दिली आहे. यासाठी एकेश्वराच्या कल्पनेला उभारले आहे. त्यात सांगितले आहे की सारे मनुष्य एकाच ईश्वराचे दास (बंदे) आहेत आणि एकच माता पित्याची (आदम, हवाची) संतान आहे. अशा प्रकारे सर्वजण एक दुसऱ्यांचे बंधू आहेत. दोन भाऊ नेहमी एक दुसऱ्यांचे दु:ख व सुखांचे साथी व एकदुसऱ्यांचे हितचिंतक व साथ देणारे आहेत. एक मनुष्य आपल्या परिस्थिती नुसार दुसऱ्याकडे काम करत असेल तर त्याच्याशी चांगला व्यवहार केला जावा. त्याच्या बरोबर नरमी आणि प्रेम करायला पाहिजे आणि त्याच्या शक्तीपेक्षा जास्त काम त्याच्याशी घेऊ नये. प्रेषित मुहम्मद (स.) ने फर्माविले की,

"हे तुमचे भाऊ आहेत ज्यांना अल्लाहने तुमच्या ताब्यात दिले आहे. ज्याच्या ताब्यात कोणत्याही भावाला दिले तर त्यांनी त्याला खाऊ घातले पाहिजे जे तो खात असेल आणि त्याला तोच पोषाख दिला पाहिजे जो स्वत: वापरत असेल. त्याच्यावर कोणत्याही प्रकारचे असले ओझे टाकले जाऊ नये की ज्याला तो सहन करू शकणार नाही. परंतु त्याच्यावर असे ओझे टाकले तर त्याची मदत करा."

अशा प्रकारे या स्थितीत मनुष्याच्या कर्तव्याच्या भावनेला उभारून नोकराकडून अल्लाहने तुमच्या जीवनातील ओझे हलके केले आहे. याबरोबर चांगल्या व्यवहाराची ताकीद याला दिली आहे.

"तुमचे हे दास (गुलाम) तुमचे भाऊ आहेत. तर यांच्याशी चांगले वर्तन करा. यांची मदत घ्या या कामत जे तुम्ही करू शकत नाही आणि यांची मदत करा त्या कामात जे ते करू शकत नाहीत."

## २) मजुराचे घाम सुकण्या अगोदर त्याला मजुरी दिली पाहिजे.

मजुरा संबंधी इस्लामची दुसरी शिकवण आहे की काम पूर्ण झाल्यावर वेळ न लावता त्याची मजूरी त्यांना दिली पाहिजे. दारिद्रय (गरीब) मजुरांची पिळवणूक करणारे जमिनदार व भांडवलदार वेठबिगारीने मजूराकडून काम सकाळ ते संध्याकाळ पर्यंत घेत असत. परंतु जेव्हा यांच्या मजूरींचा प्रश्न आला तर त्यांना काहीच माहीत नसते की त्यांना मजूरी केव्हा मिळेल व मिळेल किंवा नाही. तो सकाळ ते संध्याकाळ पर्यंत आपला घाम गाळतो परंतु मजूरी संबंधी त्याला आपल्या मालकाकडे डोळे लावून बसावे लागते. इस्लाम या व्यतिरिक्त या संबंधी कोणत्याही टालमटोल व उशीर करु शकत नाही. म्हणजे याची सक्त ताकीद आहे की मजुरांना त्यांची मजूरी घाम सुकण्या अगोदर देऊन टाकावी.

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले की, "मजुरांना त्यांची मजुरी देऊन टाका त्यांचा घाम सुकण्याचे अगोदर."

## ३) मजूरी पूर्ण दिली पाहिजे

इस्लामने ज्या प्रकारे या बाबतीत ताकीद (सक्ती) केली की, काम पूर्ण झाल्यावर वेळ न लावता (उशिर न करता) त्यांची मजूरी दिली पाहिजे. अशा प्रकारे इस्लाम ने ह्या गोष्टीची सुध्दा ताकीद (सक्ती) केली की मजूरी पूर्ण दिली पाहिजे. ज्या प्रमाणात आणि ज्या श्रमाच काम आहे त्याच प्रमाणात त्याची मजूरी दिली पाहिजे आणि याच्या मजूरीत काहीच कमी नाही केली पाहिजे. वेठबिगारीत जसं की आपण पाहिलं की, एका व्यक्ती कडून सकाळ ते संध्याकाळ पर्यंत काम घेतले जाते परंतु मजुरीच्या नावावर त्याला जी वस्तु मिळते. फक्त इतक्या प्रमाणात मिळते की तो पुन्हा आपल्या मालकाच्याकडे येण्यासाठी जीवंत राहिला पाहिजे. असे वाटते की हिन्दूस्थानात अत्याचारी ब्राम्हणत्वाच्या नेतृत्वात लोक मानवतेला विसरून प्रत्येक प्रकारचा अन्याय व अत्याचाराला उचित मानत होते.

धार्मिक श्रेष्ठत्वाचे प्रमाणपत्र अन्याय व अत्याचाराला सुध्दा देण्यात आले होते. हे जुलमी मन दुसऱ्या जमातीच्या लोकांमध्ये सुध्दा जुलमी आले आहे. इस्लाम

या जुलमी मनाला मुळापासुन उखडून फेकू इच्छितो. म्हणून इस्लामची सक्ती आहे की कोणत्याही व्यक्तीने कोणाकडून विनाकारण काहीच घेतले नाही पाहिजे. परंतु ज्याच्याकडून काहीही काम घेतले तर त्यांची मजूरी दिली पाहिजे आणि काहीच कमी न करता संपूर्ण मजूरी दिली पाहिजे. प्रेषित मुहम्मद (स.) एका हदीस खुदसी मध्ये म्हणतात की,

"अल्लाहने सांगितले की, तीन मनुष्य ज्याच्या विरुध्द मी प्रलयाच्या दिवशी साक्षीदार होऊन उभे राहाणार एक तर तो आहे जो माझ्या नावावर कोणाशी काही करार केल्यानंतर वचन भंग करतो दुसरा तो जो स्वतंत्र्य व्यक्तीला विकून त्याची रक्कम खाऊन टाकतो. तिसरा तो जो मजूराला मजूरीवर ठेवतो आणि त्याच्याकडून संपूर्ण काम घेतो. परंतु त्याची मजूरी पूर्ण पणे देत नाही."

या हदीस मध्ये मजुरी न देणाऱ्या मनुष्याला स्वतंत्र्य मनुष्याला विकून त्याची रक्कम खाण्याच्या बरोबरीचा सांगण्यात आले. ह्याच्याने हे समजते की मजूरांना त्याची मजूरी न देणे म्हणजे प्रत्यक्ष त्याला गुलाम करण्यासमान आहे.

हाफिज इब्न हजर (र.) सांगतात की,

तीसरा तो जो मजूराला मजूरीवर ठेवतो आणि त्याच्याकडून पूर्ण काम करून घेतो परंतु त्याची मजूरी परिपूर्ण देत नाही ह्यासाठी तोच आदेश आहे की एक व्यक्ती दुसऱ्या स्वतंत्र्य मनुष्याला विकून त्याची रक्कम खातो. यासाठी की याने मोबदला न देता त्याच्या श्रमाचा उपयोग करून घेतला तर त्याने त्याला खाऊन टाकले. त्याने मजूरी विना मेहनत घेतली तर त्याने त्याला आपला गुलाम केले.

प्रेषित मुहम्मद (स.) ज्या व्यक्तीकडून काम घेत होते त्याला त्याची संपूर्ण मजूरी देत होते. थोड्या कामाला सुध्दा ते मोबदला देण्यात मागे राहात नव्हते.

हजरत अनस बीन मालीक कथन करतात की, प्रेषित मुहम्मद (स.) नोकर लावीत होते आणि कोणाच्याच मजूरीत काहीही कमी करत नव्हते."

## ४) मजुरी ठरवून काम घेतले पाहिजे

इस्लाम ने जसे की मजुरांना पूर्णपणे मजूरी देण्याची ताकीद केली आहे

तशाच प्रकारे याची ताकीद केली की मजुरांना मजुरी ठरवून काम घेतले पाहिजे. यासाठी की जेव्हा पर्यंत मजूरीला ठरविले जात नाही तो पर्यंत या कमकुव्वत लोकांना अत्याचार व पिळवणूकापासून स्वतंत्र्य करू शकत नाही. इस्लाम या पळवाटांना संपवून अत्याचार पीडित लोकांचे मानवतेनुसार जबर व पिळवणूकीचे सर्व अपेक्षित धोके संपवून टाकतो. गरीब, दरिद्री, मजूर आपल्या पोटाची आग विझवण्यासाठी कामावर लागतो परंतु त्याची हिम्मत होत नाही की त्याच्या मालकाशी त्याच्या मजूरी संबंधी काही विचारावे. इस्लाम मजूर ठेवमारे (Employer) यांना ताकीद करतो की मजुरांना कामावर लावण्याच्या अगोदर त्याची मजूरी ठरवून दिली पाहिजे. प्रेषित मुहम्मद (स.) यांची हदीस आहे की,

"जे कोणी मजूराला मजूरीवर ठेवील तर त्याने त्याच्या मजूरीला अगोदरच ठरविले पाहिजे."

अशा प्रकारे अबु सईद खदरी (र.) यांचे निवेदन आहे की,

"प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मनाई केली व रोखले की मजूरांना मजूरीवर ठेवणे इथ पावते की त्याने त्यांच्या मजूरींना समोर ठेवले पाहिजे."

इमाम नसाई ने हमादच्या संबंधी नकल केली की याच्याकडून या व्यक्ती संबंधी माहिती घेतली की कोणालाही खान्याच्या वस्तुवर मजुरीवर ठेवणे याविषयी यांनी सांगितले.

नाही जेव्हा पर्यंत की तुम्ही जेवणाच्या वस्तुला ठरविले नाही.

*(नसानी जिल्द - २)*

या हदीस च्या आधारावर इस्लामी विचारवंतांनी खुलासा केला की "जो पर्यंत श्रम आणि मजूरी दोन्हीला ठरविले जात नाही. तो पर्यंत मजूर ठेवणाऱ्यांची श्रध्दा उचित नाही."

यासाठी की ज्या गोष्टीवर श्रध्दा आहे 'म्हणजे कार्य', आणि याच्या बदल्यात मिळणारा मोबदला या संबंधी माहिती न होणे म्हणजे आपसात तंटा होण्याची शक्यता असते.

## ५) शोषण करणाऱ्या जुलमी मनावर ताबा

इस्लामने मानवाच्या जुलमी मनावर ताबा ठेवला आहे. इस्लाम सांगतो की जर जगामध्ये काही लोक आर्थिक व सामाजिक स्थितीने चांगले असतील तर याचा अर्थ असा नाही की त्यांनी कमकुव्वत, गरीब आणि नादार लोकांचे रक्त शोषण करत राहावे. खुप लक्षात असू द्या की या जमीनीवर अल्लाची कृपा सर्वांवर एकसारखी आहे आणि संपूर्ण मानवजात त्याचा फायदा घेत आहे. जीवनातील मजा व आनंदावर सर्व मानवजातीचा अधिकार आहे. म्हणून अल्लाह ने काही लोकांना वेगवेगळ्या स्थितीत उंचावले तर काहींना कमी दिले. जग अल्लाहचे एक परीक्षा (स्थळ) आहे, त्यात पाऊल फुंकून व संभाळून चालण्याची गरज आहे. अल्लाहकडून पकड होण्यासाठी उशीर लागत नाही. समजा एखादा मनुष्य आपल्या मागील कर्तृत्वाला विसरून चांगले आचरण करत राहिला तर तो अल्लाहच्या कृपेला प्राप्त करू शकतो.

"तोच आहे ज्याने तुम्हाला भूतलावरील खलीफा (नायब) बनविला आणि तुमच्यापैकी काहींना काहींच्या तुलनेत अधिक उच्च दर्जे बहाल केले की ज्यायोगे जे काही तुम्हाला दिले आहे. त्यात तुमची परीक्षा घ्यावी, नि:संशय तुमचा पालनकर्ता शिक्षा देण्यातही अत्यंत सत्वर आहे. आणि फार क्षामाशील व दया करणारा देखीलआहे." *(सुरे अनाम, १६५)*

धन्य आहेत ते जे ह्या परीक्षेत पूर्णपणे उतरले आणि अल्लांहाच्या दासांचे हक्क व न्याय यांना आपले कर्तव्य समजले.

❊ समाप्त ❊